शासकीय कला संस्था व संचालनालयासाठी आवश्यक वर्गखोल्या व वसतिगृह, संगणक लॅब, बांधकाम व इमारतींचे नुतनीकरण करण्यास मान्यता मिळणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक:- एडिआर-२००९/(१३/०९) तांशि-१
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक:-२ सप्टेंबर २००९.

वाचा:- संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. डिओऔ/२००९/बोन/ दिनांक २७.५.२००९ चे पत्र

प्रस्तावना:- शासकीय कला संस्था व संचालनालयासाठी आवश्यक वर्गखोल्या व वसतिगृह, संगणक लॅब, बांधकाम व इमारतीचे नुतनीकरण करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव कला संचालक यांनी संदर्भाधीन पत्रान्वये सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:- कला संचालकांनी सादर केलेल्या शासकीय कला संस्था व संचालनालयासाठी आवश्यक वर्गखोल्या व वसतिगृह, संगणक लॅब, बांधकाम व इमारतीचे नुतनीकरण करण्यासाठी रु. ४२१.५८ /-लाख इतका निधी २००९-१०या चालू आर्थिक वर्षात खालील योजनानुसार अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | शासकीय चित्रकला महाविद्यालय, नागपूर येथील तिस-या टप्प्याचे बांधकाम करणे. | रु. २५७.७४ लक्ष |
| २) | सर ज.जी.कला वसतिगृह , वांद्रे येथील इमारतीचे नुतनीकरण करणे | रु. १०.०३ लक्ष |
| ३) | शासकीय कला महाविद्यालय,औरंगाबाद येथील पार्कींग शेड व परिसर सुधारणा करणे | रु. ०२.९६ लक्ष |
| ४) | शासकीय कला महाविद्यालय, औरंगाबाद येथील इमारतीची दुरुस्ती व नुतनीकरण करणे | रु. ६१.३० लक्ष |
| ५) | सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई येथील इमारतीच्या खिडक्यांना लोखंडी ग्रील बसविणे | रु. ०२.५८ लक्ष |
| ६) | सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई येथील इमारतीचे नुतनीकरण व दुरुस्ती करणे | रु. २०.६९ लक्ष |

२. सदरचा निधी त्याच प्रयोजनासाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षात खर्ची घालण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तुत आदेश हे नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३२३/१४७१ , दि.२८.५.२००९ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ/३४३/व्यय-५, दि.२९.५.२००९ अन्वये मिळालेल्या तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. उपरोक्त निधी ''४२०२, शिक्षण , कला , क्रीडा व सांस्कृतिक कार्य यावरील भांडवली खर्च ,०४, कला व संस्कृती, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-१०१- ललित कला शिक्षण - इमारती (००)(०१) मोठी बांधकामे-४२०२०१०१'' या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग पाच अनुक्रमांक १ परिच्छेद क्र. १३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्रशासकीय व वित्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.      प्रस्तुत शासन निर्णय www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्र. २००९०९०११३४६२०००१    असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रे. रा. दरिसटवार)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अधिष्ठाता, शासकीय कला महाविद्यालय, नागपूर,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर
जिल्हा कोषागार कार्यालय, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल ( लेखा परीक्षा ) , महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
वित्त विभाग,
नियोजन विभाग
अवर सचिव, (साशि-१ ), उच्च व तंत्र शिक्षण विभाग
निवड नस्ती - तांशि-६

C: \doa\G.R\ADR-२००९-१३-०१.doc- ४२१ lakh.doc